**ठाणे वनवृत्तातील २ राजपत्रित व १ अराजपत्रित अशा एकूण ३ अस्थायी पदे दिनांक ०१.०९.२०२० ते दिनांक २८.०२.२०२१ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय, क्रमांक :- एफएसटी-०२/२०/प्र.क्र.६५/फ-४**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २८ सप्टेंबर, २०२०

**वाचा :-** १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-३/यो/प्र.क्र.२८ (१९-२०)/१७८६, दि.३०.०९.२०१९ व दि.०७.०९.२०२०

२) शासन निर्णय क्र. एफएसटी-०२/२०/प्र.क्र.६५/फ-४, दि.३०.०३.२०२०.

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९.

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि -२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२०.

**शासन निर्णय :-**

ठाणे वनवृत्तातील २ राजपत्रित व १ अराजपत्रित अशा एकूण ३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यत संदर्भ क्रमांक-२ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. ठाणे वनवृत्तातील ३ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ अन्वये शासनास सादर केला आहे.

३. उक्त परिस्थितीत ठाणे वनवृत्तातील ३ अस्थायी पदांना (विवरणपत्र-अ प्रमाणे) दि.०१.०९.२०२० ते दि.२८.०२.२०२१ पर्यत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर मंजूरी वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२० मधील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ महसूल व वन विभागाने संदर्भाधिन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मुख्य वनसंरक्षक, ठाणे यांच्या कार्यालयातील १ पद**

| | |
|---|---|
| **प्रधान शीर्ष** | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | ०१ वनीकरण |
| **गौणशीर्ष** | ००१ संचालन व प्रशासन<br>०१ संचालन व प्रशासन |
| **उपशीर्ष** | (०१) (०२) प्रादेशिक संरक्षक वेतने (२४०६ ००४२ ०१) ०१ वेतन |

**इतर २ पदे**

| | |
|---|---|
| **प्रधान शीर्ष** | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | ०१ वनीकरण |
| **गौणशीर्ष** | १०१ वनसंधारण विकास व पुननिर्मिती<br>(०१) प्रशासन व संरक्षण |
| **उपशीर्ष** | (०१) (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६ ०१) ०१ वेतन |

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.३१.०८.२०२० मधील तरतुदीनुसार विभागास असलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२८१५००५१९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK KASHINATH LAKKAS

Digitally signed by ASHOK KASHINATH LAKKAS
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=84261302514df14d17b0d46bb1422d22bfc355b1a840ece50f14894cd6b0da24, cn=ASHOK KASHINATH LAKKAS
Date: 2020.09.28 15:03:33 +05'30'

**सोबत :- विवरणपत्र "अ"**

**(अ.का.लक्कस)**
**कार्यासन अधिकारी,महसूल व वन विभाग**

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२ मुंबई/नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) सर्व अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे.
६) ब-१ कार्यासन, फ-२ कार्यासन, फ-८ कार्यासन, फ-७ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय-३२.
७) निवडनस्ती, फ-४ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक:- एफएसटी-०२/२०/प्र.क्र.६५/फ-४,**
**दि. २८.०९.२०२०**
**विवरणपत्र "अ"**
**ठाणे वनवृत्तातील सन २०२०-२०२१ मध्ये दिनांक ०१.०९.२०२० ते २८.०२.२०२१ पर्यत पुढे चालू ठेवण्यात आलेली राजपत्रित व अराजपत्रित अस्थायी पदांची यादी**

| अ. क्र. | पदांचे नाव | अस्थायी पदांची संख्या | स्तंभ क्रमांक ३ मधील पद/ पदे ज्या शासकीय आदेशान्वये निर्माण केली त्या आदेशाचा क्रमांक आणि दिनांक | स्तंभ क्र. ३ मधील पद/पदे २०२०-२०२१ यावर्षी ज्या शासकीय आदेशान्वये पुढे चालू ठेवली होती त्याचा क्रमांक आणि दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| **मुख्य वनसंरक्षक (प्रा.) ठाणे** | | | | |
| १ | विभागीय वन अधिकारी | १ | शा.नि.म.व.व.वि.क्र.एफडीएम-१८००/१/फ-२,दि.२८.१.१९८३ टिआरएस-१०६६/२२/८६६६/ वाय, दि.२८.१०.१९६७ टिआर एस-१०६६/२२८/७६६/वाय, दि.१८.१०.१९६७ | शा.नि.क्र.एफएसटी-०२/२०/प्र.क्र.६५/फ-४, दि.३०.०३.२०२० |
| २ | मुख्य पोलीस शिपाई | १ | शा.नि.म.व.व.वि.क्र.एफडीएम-१८००/१/फ-२,दि.२८.१.१९८३ टिआरएस-१०६६/२२/८६६६/ वाय, दि.२८.१०.१९६७ टिआर एस-१०६६/२२८/७६६/वाय, दि.१८.१०.१९६७ | शा.नि.क्र.एफएसटी-०२/२०/प्र.क्र.६५/फ-४, दि.३०.०३.२०२० |
| **मुख्य वनसंरक्षक आणि क्षेत्र संचालक व्याघ्र प्रकल्प, मेळघाट, अमरावती** | | | | |
| ३ | वनक्षेत्रपाल | १ | शा.नि.म.व.व.वि.क्र.एफडीएम-१८००/१/फ-२,दि.२८.१.१९८३ टिआरएस-१०६६/२२/८६६६/ वाय, दि.२८.१०.१९६७ टिआर एस-१०६६/२२८/७६६/वाय, दि.१८.१०.१९६७ | शा.नि.क्र.एफएसटी-०२/२०/प्र.क्र.६५/फ-४, दि.३०.०३.२०२० |

***************